## भाषा संचालनालयाची इतर प्रकाशने

१ पदनाम कोश
२ वित्तीय शब्दावली
३ शासन व्यवहार कोश
४ ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश
५ गणितशास्त्र परिभाषा कोश
६ समाजशास्त्र परिभाषा कोश
७ तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र परिभाषा कोश
८ वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश
९ रसायनशास्त्र परिभाषा कोश
१० भूशास्त्र परिभाषा कोश
११ शारीर परिभाषा कोश
१२ शिक्षणशास्त्र परिभाषा कोश
१३ यंत्र अभियांत्रिकी परिभाषा कोश
१६ विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश
१७ कृषिशास्त्र परिभाषा कोश
१८ जीवशास्त्र परिभाषा कोश
१९ शरीरक्रियाशास्त्र परिभाषा कोश
२० राज्यशास्त्र परिभाषा कोश
२१ साहित्य समीक्षा परिभाषा कोश
२२ लोकप्रशासन परिभाषा कोश
२३ अर्थशास्त्र परिभाषा कोश
२४ धातुशास्त्र परिभाषा कोश
२५ मानसशास्त्र परिभाषा कोश
२६ व्यवसाय व्यवस्थापन परिभाषा कोश
२७ संख्याशास्त्र परिभाषा कोश
२८ औषधशास्त्र परिभाषा कोश
२९ न्याय व्यवहार कोश
३० मराठी लघुलेखन
३१ मराठी लघुलेखन मार्गदर्शिका
३२ मराठी टंकलेखन प्रवेशिका
३३ शासन व्यवहारात मराठी
३४ प्रशासन वाक्प्रयोग
३५ प्रशासनिक लेखन
३६ राजभाषा परिचय
३७ राजभाषा परिचय कार्यरुप व्याकरण
३८ कार्यदर्शिका
३९ शुध्दलेखन नियमावली
४० मंथन
४१ भारताचे संविधान




महाराष्ट्र शासन

# भाषाविज्ञान व वाङ्मयविद्या परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

## भाषा सल्लागार मंडळ

### अध्यक्ष

डॉ. वि. भि. कोलते

### सदस्य

प्रा. गं. बा. सरदार
डॉ. ग. मो. पाटील
प्रा. भगवंत देशमुख
श्री. देवीसिंग व्यं. चौहान
श्री. त्रिं. गो. देशमुख
प्रा. अरविंद मंगरुळकर
श्री. पी. वी. साळुंखे
प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर

### सदस्य-सचिव

श्री. प. ग. पाटील,
भाषा संचालक.

## भाषाशास्त्र उपसमिती

### अध्यक्ष

प्रा. म. वा. धोंड, मराठी विज्ञान परिषद, मुंबई

### प्रतिनिधि-सदस्य

डॉ. श्री. ना. गजेंद्रगडकर, मुंबई विद्यापीठ, मुंबई
डॉ. मु. श्री. कानडे, पुणे विद्यापीठ, पुणे
डॉ. वि. बा. प्रभुदेसाई, नागपूर विद्यापीठ, नागपूर
प्रा. पां. ना. कुलकर्णी, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
डॉ. मीना भा. जोशी, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई
डॉ. अशोक रा. केळकर, पुणे विद्यापीठ, पुणे
डॉ. सु. बा. कुलकर्णी, नागपूर विद्यापीठ, नागपूर
डॉ. यू. म. पठाण, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद

### सदस्य-सचिव

श्री. य. शं. कानिटकर, भाषा संचालक

# प्र स्ता व ना

मातृभाषा शिक्षणाचे माध्यम असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. महाराष्ट्र राज्यात मराठीला राजभाषेचे स्थान मिळाल्यानंतर पदवी परीक्षेपर्यंतच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हा विचार दृढ झाला. माध्यमाचे हे परिवर्तन घडवून आणण्यात अर्थातच अडचणी होत्या. मुख्य म्हणजे शास्त्रीय व तांत्रिक विषयांसाठी आवश्यक असलेला परिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. निरनिराळे विषय शिकविण्यासाठी आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके मराठीतून लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते, परंतु ते मर्यादित स्वरूपाचे व त्यांच्यापुरते होते. सर्व विद्यापीठांतून समान व एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी नव्याने प्रयत्न करणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी १९६७ साली महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची संयुक्त बैठक घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी आणि संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांमधील काही मूलभूत विषयांच्या उपसमित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या कामास सुरुवात केली. या उपसमित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी आणि मराठी विज्ञान परिषदेचा प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा तयार करताना, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती जवळची वाटेल याचे भान ठेवणे आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा, मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा न येता केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी शक्यतो मिळतीजुळती ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, शिक्षण, भौतिक, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीरक्रियाशास्त्र, जीवशास्त्र, राज्यशास्त्र, वाणिज्यशास्त्र (सुधारित), साहित्य समीक्षा, अर्थशास्त्र, लोकप्रशासन, धातुशास्त्र, मानसशास्त्र, ग्रंथालयशास्त्र (सुधारित), व्यवसाय व्यवस्थापन, रसायनशास्त्र (सुधारित), संख्याशास्त्र, औषधशास्त्र व गणितशास्त्र (सुधारित) या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच भूगोल, विकृतिशास्त्र, न्यायवैद्यक व विषशास्त्र व वृत्तपत्रविद्या या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण होण्याच्या मार्गावर असून ते कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत "भाषा विज्ञान व वाङ्मयविद्या परिभाषा कोश" हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे

प्रस्तुत भाषाशास्त्र उपसमितीची दिनांक १४ जून १९७६ रोजी स्थापना करण्यात आली. उपसमितीच्या एकूण ४४ बैठका झाल्या व त्यात सुमारे ३,२२५ इंग्रजी परिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले. भाषाविज्ञानाच्या पारिभाषिक संज्ञा निश्चित करताना वाङ्मयविद्या (*Philology*) व संहिता चिकित्सा (*Textual Criticism*) या क्षेत्रांतील काही परिभाषिक संज्ञांचाही अंतर्भाव करणे नंतरच्या टप्प्यात उपसमितीला आवश्यक वाटल्याने अशा संज्ञांचा अंतर्भाव असलेले वाङ्मयविद्येचे परिशिष्ट (परिशिष्ट एक, सुमारे ३६० संज्ञा) या कोशाच्या नंतर दिले आहे.

डॉ. अशोक रा. केळकर यांनी आपल्या संपादकीय प्रास्ताविकात म्हटल्याप्रमाणे [पृष्ठ चार तसेच पृष्ठ तेवीस, परिच्छेद (४)] भाषाशास्त्र उपसमितीने वाङ्मयविद्या या विषयाचा परिभाषा कोश परिशिष्टरूपाने साहित्य समीक्षा परिभाषा कोशाला जोडण्याचा प्रस्ताव मांडला होता. परंतु साहित्य समीक्षा परिभाषा कोश याआधी १९८७ मध्येच प्रकाशित करण्यात आला असून वाङ्मयविद्या परिभाषा कोशाला अंतिम रूप देण्याचे काम पूर्ण झालेले नसल्याने साहित्य समीक्षा परिभाषा कोशाला हे परिशिष्ट जोडता आले नाही. तसेच, सुरुवातीस हा कोश प्रकाशित करताना इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी असा प्रकाशित करावयाचे ठरले होते. परंतु काही व्यावहारिक अडचणींमुळे मराठी-इंग्रजी कोश प्रकाशित करण्याचे स्थगित करण्यात आले.

या उपसमितीचे अध्यक्ष व सदस्य, तसेच अभ्यागत सौ. सुहासिनी लद्दू व प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी परिभाषा निर्मितीसाठी घेतलेल्या परिश्रमांबद्दल आणि महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलसचिव यांनी वेळोवेळी केलेल्या सहकार्याबद्दल मी त्या सर्वांचे शासनाच्या वतीने मन:पूर्वक आभार मानतो.

या कोशाची मुद्रिते तपासताना काही त्रुटी आढळल्या. त्यांचे निराकरण करण्यासाठी उपसमितीचे सदस्य डॉ. अशोक केळकर यांनी आस्थेने सहकार्य केले याचाही येथे कृतज्ञतापूर्वक निर्देश केला पाहिजे.

या कोशामधील उच्चारभेदक चिन्हे (*Diacritic Marks*) आणि वर्तनी चिन्हे (*Orthographic Marks*) यांमधील चिन्हांची मुद्राक्षरे, अक्षरमुद्रणामध्ये (*Letterpress*) उपलब्ध नसल्यामुळे ती स्कॅनिंगद्वारे तयार करून परिशिष्टरूपाने कोशाच्या शेवटी जोडली आहेत (परिशिष्ट दोन). मूळ कोशात त्या नोंदी व त्यांचे मराठी पर्याय आहेतच, परंतु संबंधित चिन्हे मात्र वाचकांना परिशिष्टातच पाहावयास मिळतील.

या कोशाची जुळणी होऊन तो मुद्रणावस्थेत असतानाच शासकीय मुद्रणालयाचे संगणकीकरण होण्यास सुरुवात झाली. या कामासाठी आवश्यक असलेली वेगवेगळ्या प्रकारची मुद्राक्षरे, फॉन्ट इत्यादी उपलब्ध होऊ शकले नाहीत. त्यामुळे या कोशात मुद्राक्षरांची एकरूपता ठेवता आलेली नाही.

*या कोशाचे मुद्रण करताना वर उल्लेख केल्याप्रमाणे अनेक तांत्रिक अडचणी आल्या, त्यामुळे मुद्रणास विलंबही झाला. परंतु, संचालक, शासकीय मुद्रण व लेखन-सामग्री, मुंबई यांनी त्या सर्व अडचणी दूर करून मुद्रणाचे काम अतिशय चांगल्या रीतीने पार पाडले. त्याबद्दल मी त्यांचाही अत्यंत आभारी आहे.*

*अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.*

*शास्त्रीय परिभाषा ही सतत विकसित होत असते. या कोशातील परिभाषेचा जाणकारांनी आपुलकीने व अभ्यासू वृत्तीने विचार करावा व तिचा वापर करताना त्यांच्या नजरेस येणाऱ्या उणिवा कृपया भाषा संचालनालयाच्या निदर्शनास आणून द्याव्यात. तसेच ती सुधारण्याच्या दृष्टीने काही सूचना करावयाच्या असल्यास, त्या भाषा संचालनालयाकडे अवश्य पाठवाव्यात अशी विनंती आहे.*

**प. ग. पाटील,**
*भाषा संचालक,*
*महाराष्ट्र राज्य.*

*मुंबई,*
*दिनांक १ मे २००१.*

# संपादकीय प्रास्ताविक

## (एक) भाषाशास्त्र–उपसमितीचे कार्य

भाषाविज्ञान आणि संलग्न ज्ञानशाखा यांमधून वापरल्या जाणाऱ्या पारिभाषिक संज्ञांचा हा इंग्लिश-मराठी शब्दकोश आहे. महाराष्ट्र शासनाच्या भाषा संचालनालयाने या कामासाठी एक भाषाशास्त्र-उपसमिती नेमलेली होती. या उपसमितीचे सदस्य पुढील-प्रमाणे होते :

(१) प्रा. म. वा. धोंड (मराठीचे निवृत्त प्राध्यापक, मराठी विज्ञान परिषदे-तर्फे) (अध्यक्ष)
(२) डॉ. श्री. ना. गजेंद्रगडकर (भाषाविज्ञानाचे प्राध्यापक, मुंबई विद्यापीठ)
(३) डॉ. मु. श्री. कानडे (मराठीचे प्राध्यापक, पुणे विद्यापीठ)
(४) डॉ. यू. म. पठाण (मराठीचे प्राध्यापक, मराठवाडा विद्यापीठ)
(५) डॉ. वि. बा. प्रभुदेसाई (मराठीचे प्राध्यापक, नागपूर विद्यापीठ)
(६) प्रा. पां. ना. कुलकर्णी (मराठीचे प्राध्यापक, शिवाजी विद्यापीठ)
(७) डॉ. मीना भा. जोशी (मराठीच्या प्रपाठक, श्री. ना. दा. ठा. महिला विद्यापीठ)
(८) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य (पदसिद्ध सदस्य-सचिव)

नंतर पुढील व्यक्तींना अतिरिक्त सदस्य म्हणून घेण्यात आले :

(१) डॉ. अशोक रा. केळकर
(उपयोजित भाषाविज्ञानाचे प्राध्यापक, पुणे विद्यापीठ)
(३० ऑक्टोबर १९७६ पासून)

(२) डॉ. सु. बा. कुलकर्णी
(भाषाविज्ञानाचे प्रपाठक, नागपूर विद्यापीठ)
(२६ जून १९७८ पासून)

पुढील विद्वान निमंत्रित म्हणून काही बैठकींना उपस्थित राहिले :

(१) प्रा. अ. गं. मंगरूळकर
(संस्कृतचे निवृत्त प्राध्यापक, पुणे)

(२) डॉ. सुहासिनी लद्दू
(संस्कृत व मराठीच्या व्याख्यात्या, पुणे)

(३) डॉ. सु. बा. कुलकर्णी
(भाषाविज्ञानाचे प्रपाठक, नागपूर)

उपसमितीच्या एकंदर ४४ बैठकी झाल्या, त्यापैकी पहिली १६ ऑगस्ट १९७६ ला आणि शेवटची १७ फेब्रुवारी १९७९ ला झाली. काम समाप्त करतेवेळी उपसमितीने झालेल्या विचारविमर्शामधून हाती आलेल्या यादीचे संपूर्णतया संपादन करण्याचे कार्य डॉ. अशोक रा. केळकर यांच्याकडे सोपविले.

निमंत्रित मंडळींनी केलेले साहाय्य (दुर्दैवाने त्यांच्यापैकी प्रा. मंगरुळकर आणि डॉ. सौ. लद्दू आज आपल्यामध्ये नाहीत) आणि भाषा संचालनालयाने दाखवलेले घसघशीत सहकार्य व धीर याबद्दल उपसमितीला आपली कृतज्ञता व्यक्त करून ठेवावीशी वाटते.

कामकाजाच्या सुरुवातीच्या काळातच उपसमितीच्या लक्षात एक गोष्ट आली. संचालनालयाने इतर ज्ञानशाखांसाठी नेमलेल्या समांतर उपसमित्या ज्या सर्वसाधारण तत्त्वांनुसार काम करतात त्याच कक्षेत तिला आपले काम करायचे असले तरी भाषाविज्ञान आणि संलग्न ज्ञानशाखांसाठी परिभाषा निश्चित करताना उपसमितीला काही विशेष बाबी लक्षात घ्याव्या लागणार आहेत. या बाबी पुढे नमूद केल्या आहेत :

(१) सध्याच्या भारतीय विद्याक्षेत्रातील इतर अनेक ज्ञानशाखांची परंपरा जशी प्लेटो-ॲरिस्टॉटलपर्यंत शोधावी लागते तशी आधुनिक भाषाविज्ञानाची स्थिती नसून त्याची पूर्वपीठिका प्राचीन संस्कृत व्याकरणकार आणि शिक्षाकार यांच्यापर्यंत पोचते. किंबहुना इंग्लिशमधील काही संज्ञा तर सरळ संस्कृतमधून घेतलेल्या आहेत (उदा. sandhi, bahuvrihi) किंवा संस्कृतवरून अनुवादित केलेल्या आहेत (उदा. voiced, word-finder या अर्थाने thesaurus).

(२) भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात काम करणारी मंडळी भाषेबद्दल बोलतात–लिहितात त्या वेळी त्यांना एका विशिष्ट स्थितीला तोंड द्यावे लागते. त्यांचा अध्ययन–विषय आणि त्यांचे अभिव्यक्तीचे माध्यम एकच म्हणजे भाषा हे आहे. कदाचित यामुळे असेल आणि इतरही कारणांमुळे असेल या क्षेत्रात एकाच गोष्टीला समानार्थी संज्ञा असण्याचे प्रमाण लक्षणीय आहे. उदाहरणार्थ एकाच व्यंजन-प्रकाराला इंग्लिशमध्ये fricative ही पारदर्शी संज्ञा जशी आहे तशी spirant (म्हणजे श्वासोच्छ्वास करणारे) ही अपारदर्शी संज्ञाही आहे. मराठी परिभाषेत दोन वेगवेगळ्या संज्ञा देत बसण्याने काही साधणार नसून या दोन संज्ञांपैकी fricative ही संज्ञा पसंत करून तिच्या धर्तीवर मराठी संज्ञा घडवणे हे श्रेयस्कर ठरेल.

(३) भाषाविज्ञानाला जरी प्राचीन भारतीय मूलपीठिका असली तरी सध्याच्या भारतीय विद्याक्षेत्रात त्याचे स्थान साहित्याभ्यास आणि वाङ्मयविद्या यांच्या सावटातच बरेचसे रहात आलेले आहे. अगदी इंग्लिशच्या माध्यमातून देखील या विषयाचे अध्यापन अलीकडेच होऊ लागले आहे. मग मराठीच्या माध्यमातून त्याचे अध्यापन तर दूरच राहिले आहे. म्हटले तर उपसमितीला ही स्थिती आपल्या कामाला अनुकूल मानता येईल : morpheme साठी **पदिम** (आणि morph साठी **पद**) किंवा linguistics साठी **भाषाशास्त्र** (ज्या ठिकाणी **शास्त्र** या पदामुळे एखाद्या व्यावहारिक कार्याची नियामक व्यवस्थिती सुचवली जाते) यांच्यासारख्या चुकीच्या संज्ञांचे उच्चाटन करण्याची वेळ अजून तरी गेलेली नाही. आपल्या विषयाला मिळालेली ही नियामक आणि वाङ्मयीन डूब दूर ठेवायची आहे, इकडे लक्ष वेधण्यासाठी उपसमितीने प्रस्तुत कोशाला **भाषाशास्त्र परिभाषा-कोश** न म्हणता **भाषाविज्ञान परिभाषाकोश** हे नाव द्यायचे ठरवले. पण या

नाण्याची दुसरी बाजू म्हणजे या उपसमितीवरची जबाबदारी वाढलेली आहे. मराठी माध्यमातून भाषाविज्ञान विषयाबद्दल अगोदरपासून काही बोलणे-लिहिणे चालू आहे आणि हा अनुभव जमेला धरता येत आहे अशी स्थिती मुतराम नाही.

(४) कोणतीही जिवंत विद्याशाखा भराला आली असली तर तिच्यात सतत वाढ होणार, बदल होणार. आज हे भाषाविज्ञान क्षेत्राला विशेषच लागू आहे. नवनवीन संज्ञा घडवल्या जात आहेत आणि कधी त्या जुन्या संज्ञांची जागा घेत आहेत. तर्कशास्त्र, समाजविज्ञान, सांख्यिकी यांसारख्या इतर ज्ञानशाखांशी संवाद चालल्यामुळेही काही संज्ञा नव्याने भाषावैज्ञानिकांच्या वापरात येत आहेत. (कोशाचे संपादन करताना उपसमितीला उपलब्ध नसलेल्या पण अलीकडे पुष्कळ प्रमाणात वापरात आलेल्या कित्येक संज्ञा कोशात घेण्याची संधी संपादकाने घेतलेली आहे*.) अर्थात कोशाची संपादित मुद्रणप्रत सिद्ध झाल्यानंतरही कित्येक संज्ञा कोश प्रकाशित होईपर्यंत प्रचारात आलेल्या असणार हे उघड आहे.

ही सगळी परिस्थिती लक्षात घेऊन तिला तोंड देण्यासाठी उपसमितीने तिच्या अपेक्षित कार्यकक्षेच्या काहीशा बाहेर पडणाऱ्या जबाबदाऱ्याही अंगावर घेतल्या. त्या पुढे नमूद केल्या आहेत :

(१) इंग्लिश भाषेतील परिभाषा केवळ आहे तशी गृहीत न धरता उपसमितीने तिच्यात थोडी निश्चिती आणि सुसूत्रता शोधण्याचे मनावर घेतले. उदाहरणार्थ spirant बाजूला ठेवून fricative ला पसंती दिली, मोठ्या संख्येने येऊ पाहणाऱ्या नवनव्या संज्ञांमध्ये निवडानिवड केली. इतर उपसमित्यांप्रमाणे या उपसमितीने संज्ञांच्या शोध-याद्या कोशात दिल्या (उदाहरणार्थ भाषाप्रभेदांची यादी), पण त्या याद्या अधिक जास्त देण्याची आणि त्या अधिक कसोशीने पूर्ण करण्याची खबरदारी घेतली.

(२) भारतीय परंपरेतून आलेल्या संज्ञांची उपसमितीने वेगळी खूण करून नोंद केली, मग त्या संज्ञा आजच्या गरजांना श्रेयस्कर ठरोत वा न ठरोत. उदाहरणार्थ phonetics, phonology, prescriptive phonology या संज्ञांसाठी **स्वनविज्ञान, स्वनव्यवस्थाविचार, नियामक स्वनव्यवस्थाविचार** या वेगवेगळ्या संज्ञा तर दिल्याच आहेत, पण ही तीनही क्षेत्रे व्यापणारी **शिक्षा** ही पारंपरिक संज्ञाही नोंदवली आहे. **संधि** ही संज्ञा आजही वापरण्यासारखी आहे, पण ती नव्याने घडवलेली नसून पारंपरिक आहे हेही नोंदवले आहे. कधी कधी तर एखाद्या पारंपरिक संज्ञेला प्रतिसंवादी संज्ञा इंग्लिशमध्ये लिहिणाऱ्या प्राच्यविद्याविषयक लेखनातही जर न मिळाली तर उपसमितीने एक इंग्लिश संज्ञा त्या ठिकाणी नव्याने हजर केली आहे (तशी खूण करून). उदाहरणार्थ, **शाब्दबोधनिमित्त** आणि त्यात पडणारे **प्रवृत्तिनिमित्त** आणि **व्युत्पत्तिनिमित्त** या पारंपरिक संज्ञांसाठी अनुक्रमे ground for

---

*या संदर्भात संपादकाला डॉ. रमेश वा. धोंगडे (डेकन कॉलेज), डॉ. प्रवाल दासगुप्त (डेकन कॉलेज), आणि डॉ. उदयनारायण सिंह (दिल्ली विद्यापीठ) यांचे त्यांच्या बहुमोल साहाय्याबद्दल आभार मानावेसे वाटतात.

interpretation of linguistic form, signifying power as ground, आणि systemic power as ground ह्या इंग्लिश संज्ञा सुचवल्या आहेत. **व्यंजनाव्यापार** साठी नेहमी देण्यात येणारी suggestion संज्ञा तितकी समाधानकारक नाही, त्यासाठी enrichment of meaning श्रेयस्कर आहे हेही नमूद केलेले आहे.

(३) प्रस्तुत इंग्लिश-मराठी कोश प्रकाशित झाल्यावर जी मंडळी भाषा-विज्ञानाविषयी इतर अर्वाचीन भारतीय भाषांतून बोलण्या-लिहिण्याचा उद्योग करीत आहेत त्यांनाही तो उपयोगी पडू शकेल हे उपसमितीने लक्षात घेतले आहे. उदाहरणार्थ, काही ठिकाणी एक संस्कृतच्या जवळची आणि एक मराठी वळणाची अशा दोनदोन संज्ञा देऊन ठेवल्या आहेत: जसे collation (of data) साठी **परितुलन, समाकलन** एका बाजूला आणि **जुळवणी** दुसऱ्या बाजूला अशा संज्ञा दिल्या आहेत.

(४) उपसमितीने साहित्यिक भाषेच्या अध्ययनासाठीच्या deviation किंवा enrichment of meaning सारख्या काही संज्ञांचा समावेश कोशामध्ये करायचे ठरवले. साहित्यसमीक्षा-उपसमितीपुढे भाषाशास्त्र-उपसमितीने असाही एक प्रस्ताव मांडला की philology किंवा वाङ्मयविद्या या विषयाचा एक लहान परिभाषाकोश तयार व्हावा आणि तो साहित्यसमीक्षा परिभाषाकोश आणि भाषाविज्ञान परिभाषाकोश या दोन्ही कोशांना परिशिष्ट रूपाने जोडण्यात यावा. (दोन्ही उपसमित्यांनी हे परिशिष्ट तयार करण्याचे काम डॉ. केळकरांकडे सोपवायचे ठरवले.)

(५) संज्ञा घडवणे, निवडणे, त्यांचा पसंतीचा क्रम ठरवणे ही आपली कामे उपसमितीने कोणत्या मार्गदर्शक तत्त्वांना धरून पार पाडली याचे एक काळजी-पूर्वक तयार केलेले निवेदन कोशाबरोबर द्यायचे उपसमितीने ठरवले. कोशात येऊन गेलेली सामग्री कोणत्या पद्धतीने मांडली आणि प्रस्तुत केली आहे याची कोशाचा उपयोग करणाऱ्यासाठी एक मार्गदर्शिकाही कोशाबरोबर द्यायचे ठरवले. मार्गदर्शक तत्त्वांचे निवेदन आणि उपयोगकर्त्यांसाठीची मार्गदर्शिका ही प्रस्तुत प्रास्ताविकाचा अनुक्रमे दुसरा व तिसरा छेदक म्हणून मराठीत आणि (अ-मराठी उपयोगकर्त्यांची गरज लक्षात घेऊन) इंग्लिशमध्ये देण्यात येत आहे.

(६) पारंपरिक संस्कृत परिभाषेचा आधुनिक भाषाविज्ञानाच्या दृष्टीने उपयोग करून घेताना उपसमितीच्या लक्षात काही अडचणीच्या बाबी आल्या. उदाहरणार्थ, vowel आणि tone या दोन्ही संज्ञांसाठी **स्वर** ही एकच संज्ञा आहे. **वर्ण** म्हणजे speech sound ठरतो त्याचप्रमाणे त्याचे लिखित रूपही ठरते. **अक्षर** म्हणजे syllable आणि speech sound हे दोन्ही अर्थ होतात. **पठन** म्हणजे स्मरणातून केलेले recitation होते, त्याचप्रमाणे लिखित पाठाच्या-वरून केलेले recitation होते. **सर्वनाम** म्हणजे वास्तविक एक नामविकाराचा गण, पण आज त्याचा वापर बऱ्याच भाषांतून **संज्ञा-प्रतिनिधि** या संज्ञेच्या ऐवजी होतो. पण pronoun साठी योग्य प्रतिशब्द **संज्ञा-प्रतिनिधि, सर्वनाम** नव्हे. **संहिता** या संज्ञेचे वास्तविक अर्थ दोन होत असत-एक transition (between speech sounds)

आणि दुसरा corpus (or text). पण आज तिचा text या **संज्ञेला प्रतिशब्द** म्हणून बरीच मंडळी चुकीने उपयोग करतात. ही चूक एका जुन्या वचनाचा भलता अर्थ लावल्यामुळे झाल्याचे दिसते. (यास्क, **निरुक्त** १ : १७, **ऋग्वेदाचे प्रातिशाख्य** २ : १) पद प्रकृतिः संहिता। योग्य अर्थ : 'संहिता-पाठ, म्हणजे जोडून म्हटलेला पाठ, हा ' पद-पाठ ' म्हणजे पदे तोडून म्हटलेला पाठ, यापासून बनवलेला असतो' (चुकीचा अर्थः 'संहिता' म्हणजे पाठ्य, ही पदांपासून बनवलेली असते'). उपसमितीने यांसारख्या अडचणींमधून आपल्या पद्धतीने वाट शोधली आहे, इतरांना ती समाधानकारक वाटेल अशी आशा आहे. उदाहरणार्थ, जिथे tone अर्थ असेल तिथे **स्वर** संज्ञा न वापरता **सुर**-जणू काही संस्कृतमधले प्रातिपदिक असल्याप्रमाणे वापरलेले आहे. नाही तरी **स्वर** चा जेव्हा संगीतामधला tone असा अर्थ असतो तेव्हा त्याबद्दल नंतर **सुर** हे त्याचे परिवर्तित रूप वापरले गेले आहेच आणि भाषाविज्ञानामधला tone संगीतामधल्या tone शी संबंधित आहे. (एक शक्यता अशी दिसते की **स्वर** संज्ञेचे दोन अर्थ म्हणजे एका संज्ञेला फुटलेले अर्थाचे दोन धुमारे नसून व्युत्पत्तिदृष्ट्या भिन्न संज्ञांचे झालेले समरूपीभवन आहे.)

या कोशाचा प्रत्यक्षात उपयोग करणाऱ्याला काही उपयुक्त सूचना त्यामधून मिळाव्या अशी उपसमितीला आशा वाटते. (ही गोष्ट लक्षात घेऊन उपसमितीने संचालनालयाला अशी शिफारस केली आहे की त्यांनी या कोशाची एक व्यतिक्रमी मराठी-इंग्लिश सूची करवून घेऊन प्रकाशित करावी.) उपसमितीला अशीही आशा आहे की कोशाचे चिकित्सक वाचक, उपसमिती आपण डोळ्यांसमोर ठेवलेले साध्य गाठण्यात कितपत सफल झाली आहे याचा नीट शोध घेतील. उपसमितीला ही जाणीव आहे की अशा प्रकारे एखाद्या समितीने बसून संज्ञा घडवणे हा फार तर वेळ वाचवण्यासाठी स्वीकारलेला आपद्धर्म आहे. (पतंजलि यांच्या एका वचनाची इथे आठवण व्हावी—'घड्याचे काम लागले तर माणूस कुंभारवाड्यात जाऊन म्हणतो की एक घडा बनवून द्या, मला घड्याचे काम पडले आहे. पण शब्दाचे काम पडले तर माणूस व्याकरणकारवाड्यात जाऊन असे कधी म्हणत नाही की एक शब्द घडवून द्या, मला त्याचा प्रयोग करायचा आहे. माणूस मनातल्या मनात विचार करून भिन्नभिन्न अर्थांसाठी शब्द उपयोगात आणतो'. **व्याकरणमहाभाष्य** १ : १ : १ 'सिद्धे शब्दार्थसंबन्धे' वरची चर्चा.) आपल्या विषयात रमलेल्या विद्वानांचा वार्तालाप ही परिभाषेची स्वाभाविक जन्मभूमि आहे. उपसमितीला हीही जाणीव आहे की फळत्या, फुलत्या ज्ञानशाखेसाठी परिभाषा घडवण्याचे काम (एखाद्या गृहिणीच्या कामाप्रमाणेच) कधी पुरे न होणारे काम आहे. उपसमितीने अखेरचा शब्द उच्चारलेला नाही, स्वतः विसर्जित होण्यापूर्वी तिने पहिली खेळी केली आहे इतकेच.

## (दोन) परिभाषानिश्चितीची अंतर्निहित तत्त्वे

पारिभाषिक संज्ञा दोन प्रकारच्या असतात---गुणलक्षी पारिभाषिक संज्ञा (technical terms collected into a technical terminology) आणि व्याप्तिलक्षी पारिभाषिक संज्ञा (technical names collected into a technical nomenclature). प्रस्तुत कोशकार्याचा मुख्य रोख phoneme, language family, diglossia यांच्यासारख्या गुणलक्षी पारिभाषिक संज्ञांसाठी प्रतिशब्द हजर करण्याकडे असला तरी यांच्या जोडीला Indo-European language family, High German, Old Marathi यांच्यासारख्या काही थोड्या निवडक व्याप्तिलक्षी पारिभाषिक संज्ञासाठी प्रतिशब्द देण्याकडेही लक्ष पुरवले आहे. (निवडक संज्ञा म्हणजे मराठीमध्ये भाषाविज्ञानविषयक भाषण-लेखन करणारा ज्यांच्यामुळे विचारात पडेल अशा संज्ञा.) ह्या दोन्ही प्रकारच्या संज्ञा मिळून त्या त्या विषयाची परिभाषा तयार होते. या परिभाषेभोवती मानवी भाषेचा परिभाषासापेक्ष भाषाव्यवहार चालत असतो. मानवी भाषा ही संस्था आणि विविध विशिष्ट भाषा यांचे वैज्ञानिक वर्णन करायचे तर ते वर्णन सुद्धा अशा परिभाषासापेक्ष व्यवहाराचेच उदाहरण ठरेल. नेहमीच्या व्यवहारातील शब्दाचा पारिभाषिक उपयोग करणे काय (उदाहरणार्थ language family मधला family शब्द) किंवा पारिभाषिक कामासाठी नव्याने शब्द घडवणे काय (उदाहरणार्थ phoneme, diglossia), अशा ठिकाणी भाषेचा उपयोगकर्ता (इंग्लिश, मराठी, जी कोणती भाषा असेल तिचा) हा भाषेला मुद्दाम होऊन नव्याने काही वळण देत असतो. असे वळण देताना अशा उपयोगकर्त्याला विशिष्ट तत्त्वांचा यथाशक्य अंगीकार करणे सहज जमण्यासारखे आहे. प्रस्तुत कोशकार्यामध्ये अंतर्निहित अशी तत्त्वे पुढे नमूद केली आहेत. या तत्त्वांना धरुन परिभाषानिश्चिती करण्याचा कसोशीने प्रयत्न केला आहे. तो पूर्णतः सफल झालेला नाही हा भाग निराळा.

(१) **क्षेत्राचा निःशेष परामर्श :** परिभाषा अशी असावी की तिच्या मदतीने क्षेत्रात येणाऱ्या सर्व गोष्टींची गुणबोध आणि व्याप्तिबोध या दोन्ही अंगांनी दखल घेता यावी, कोणतीही गोष्ट सुटू नये.

उदाहरणार्थ, नेहमीच्या बोलण्यात आपण तारेमधले शब्द मोजतो किंवा शालेय पाठ्यपुस्तकामधल्या शब्दांची मोजदाद करायची म्हणतो. पण या दोन्हींमध्ये फरक आहे आणि तो पारिभाषिक पद्धतीने अनुक्रमे word tokens ची मोजणी आणि word types ची मोजणी असा सांगावा लागेल. हा type आणि token मधला भेद सर्व-साधारण स्वरूपाचा आहे आणि तो तर्कशास्त्र आणि सांख्यिकी यांमधून उचललेला आहे.

(२) **केवळ क्षेत्राचाच परामर्श :** परिभाषा अशी असावी की तिच्या आटोपात फक्त क्षेत्रात मोडणाऱ्या गोष्टींची गुणबोध आणि व्याप्तिबोध या दोन्हीं अंगांनी दखल घेतली जावी, क्षेत्राशी अप्रस्तुत असणाऱ्या गोष्टींत ती पडणार नाही. उदाहरणार्थ corruption of language किंवा अपभ्रंश ही संकल्पना म्हणा, sacred language ही संकल्पना म्हणा या आधुनिक विज्ञाननिष्ठ भाषाविचारात प्रस्तुत नाहीत; त्यांची दखल फार तर जणू अवतरणचिह्नांकित संकल्पना म्हणून,

टाकून दिलेल्या कल्पना किंवा अतज्ज्ञाच्या कल्पना म्हणून केवळ घेता येईल. काही संज्ञा (उदाहरणार्थ allegory) पारिभाषिक असून बाजूला ठेवण्यात आल्या, कारण त्यांचा संबंध असला तर इतर ज्ञानशाखांशी आहे, भाषाविज्ञानाशी नाही.

(३) **व्याख्यासुलभता :** पारिभाषिक संज्ञा अशी असावी की तिने गुणबोधाच्या आणि व्याप्तिबोधाच्या मार्फत होणारा वस्तुनिर्देश पडताळण्याजोगा असावा.

उदाहरणार्थ, भाषाविज्ञानाचा व्याख्या देणारा कोश घेतला तर एखादी भाषा synthetic आहे का polysynthetic आहे हे नेमके ठरवण्याची त्यात सोय पाहिजे. (प्रस्तुत कोश अर्थातच व्याख्या देणारा कोश नसून केवळ द्वैभाषिक यादी एवढेच त्याचे स्वरूप आहे.) काही संज्ञा (उदाहरणार्थ genetically isolated language किंवा अधिकात अधिक analytic language–जिच्यात दर पदामध्ये एकच रुपिम असेल) अशा असतील की त्या कोणत्या ना कोणत्या भाषेला लागू पडतील की कोणत्याच भाषेला लागू पडणार नाहीत हे जागतिक भाषांबद्दल आपल्याला आजच्या घटकेला जी माहिती असेल तिच्यावर अवलंबून राहील.

(४) **एकतंत्ररक्षण आवश्यक :** एकाच परिभाषेचा दोन जणांनी उपयोग केला तर विशिष्ट बाबतीत एखादी संज्ञा लागू पडते की नाही हे एकमताने ठरवता येईल अशी स्थिती असावी.

असे एकतंत्रत्व टिकवण्यासाठी घ्यायची एक खबरदारी म्हणजे एखाद्या संज्ञेचा साध्या व्यवहारातला उपयोग आणि तिचा पारिभाषिक उपयोग यात सहसा विरोध येऊ न देणे. उदाहरणार्थ एखाद्या भाषेला इतर भाषांची parent language म्हणणे ठीक, mother language म्हटले तर मग father language कोणती हा गैरलागू प्रश्न उपस्थित होण्याचा किंवा mother tongue शी घोटाळा होण्याचा धोका संभवतो. friction साठी **घर्षण** हा प्रतिशब्द ठीक, **संघर्ष** या शब्दाला सामान्यत: विरोधाचा अर्थ चिकटलेला आहे.

(५) **जिथे अर्थवैषम्य तिथे रूपवैषम्य :** एकाच परिभाषेतल्या आणि विशेषत: एकाच संदर्भात येण्याजोगत्या दोन संज्ञा घेतल्या तर त्यांच्यात ऐकण्यात किंवा वाचण्यात घोटाळा होईल अशी त्यांची रूपे नसावी, त्या समरूप किंवा तुल्यरूप नसाव्या.

वैदिक संस्कृतचे vowels आणि word tones या दोन्हींचा निर्देश **स्वर** या एकाच संज्ञेने करणे गैरसोयीचे आहे. inscription आणि document या दोन्ही संज्ञांसाठी **अभिलेख** हा एकच प्रतिशब्द योजणे बरोबर नाही. प्रस्तुत कोशात **अभिलेख** document साठी राखून ठेवला आहे तर inscription साठी **चिरलेख** किंवा **उत्कीर्णलेख** हे सुचवले आहेत (आणि graffito साठी **सहज-उत्कीर्ण-लेख** योजला आहे.)

(६) **जिथे रूपवैषम्य तिथे अर्थवैषम्य :** एकाच परिभाषेतल्या दोन संज्ञा घेतल्या तर त्यांच्यापासून होणारा गुणबोध किंवा व्याप्तिबोध पुरेसा वेगळा असावा.

उदाहरणार्थ, इंग्लिश भाषेत ज्याला ब्रिटिश लोक fricative म्हणतात त्याला अमेरिकन लोक spirant म्हणतात. ही आधीच काही बरी गोष्ट नव्हे, आणि त्याखातर मराठी भाषकांनी पहिल्याला **घर्षक** आणि दुसऱ्याला समजा **श्वासक** अशा दोन संज्ञा वागवण्याची काही गरज नाही. प्रस्तुत कोशात spirant खाली पाहिले तर **spirant** (*better :* **fricative**) एवढा हवाला फक्त मिळेल. जर **–वाचक, –सूचक, –द्योतक, –अर्थी** अशी निरनिराळी रूपे हाताशी आहेत तर त्यांचा वाटेल तसा उपयोग करणे वेंधळेपणाचे आहे, त्या त्या रूपांमध्ये अर्थाच्या दृष्टीने निश्चित पद्धतीने फरक करणे हा भाषिक संपत्तीचा डोळस उपयोग ठरेल.

(७) **शब्दरूपाकडून अर्थाची सुलभ प्राप्ति :** पारिभाषिक संज्ञा शक्य तितकी पारदर्शी असावी.

उदाहरणार्थ, number साठी **वचन** पेक्षा **संख्यावचन** ही अधिक बरी संज्ञा आहे. **एकवचन** किंवा **बहुवचन** यांमधून **वचन** वेगळे काढले असणार, त्याचा अर्थ 'संख्या दाखवणारे' नसून केवळ 'दाखवणारे' एवढाच आहे. **पद** (म्हणजे **आत्मनेपद, परस्मैपद** या दोन्हीसाठी), **अर्थ** (म्हणजे **आज्ञार्थ, विध्यर्थ** इत्यादि), आणि **लिंग** (म्हणजे **पुंलिंग, स्त्रीलिंग, नपुंसकलिंग**) या संज्ञा अशाच गाफीलपणाने तयार झालेल्या आहेत. पहिल्या उदाहरणात diathesis साठी **उपग्रह** ही संज्ञा परंपरेत उपलब्ध आहे. दुसऱ्या उदाहरणात mood साठी प्रस्तुत कोशात **अभिवृत्ति** ही संज्ञा सुचवली आहे. तिसऱ्या उदाहरणात मात्र **लिंग** (म्हणजे खरे तर खूण) ही संज्ञा टाळणे कठीण दिसते; इंग्लिशमधल्या gender ची स्थिति फारशी वेगळी नाही (gender म्हणजे केवळ जात, प्रकार). **लिंग** संज्ञेच्या अपारदर्शकपणाची भरपाई तिच्या व्यवहारातील sex-kind या परिचित अर्थामुळे झाली आहे एवढे खरे. preposition आणि prepositional phrase संज्ञा मराठी भाषेसाठी वापरणे किंवा anaphora संज्ञा पूर्ववर्ती प्रतिनिधीसाठी वापरणे योग्य नाही. Glossematics या अपारदर्शी संज्ञेपेक्षा Copenhagen School किंवा Hjelmslevian School या सामीप्यमूलक लक्षणेवर आधारलेल्या संज्ञा पुष्कळ बऱ्या. भाषेच्या उगमाबद्दलच्या उपपत्तींना दिलेली bow-wow theory किंवा ding-dong theory ही टोपणनावे किंवा प्रक्रियेचे उदाहरण देऊन काम भागवणारी **बहुव्रीहि-समास** ही संज्ञा किंवा click consonant ही नादानुकारी संज्ञा या आपल्या पारदर्शी-पणाच्याच जोरावर टिकून आहेत.

(८) **अर्थाकडून शब्दरूपाची सुलभ प्राप्ति :** पारिभाषिक संज्ञा जितकी नियमित पद्धतीने घडवलेली असेल तितके चांगले.

उदाहरणार्थ, नाम tooth तर विशेषण dental, नाम tooth-ridge तर विशेषण alveolar ही इंग्लिशमधली स्थिती गैरसोयीची आहे. (दुसऱ्या उदाहरणात tooth-ridge ऐवजी alveolus वापरून ही गैरसोय दूर करता येईल.) **सघोष** किंवा **घोषवत्** आणि **अघोष** ही विशेषणे लक्षात घेतली तर voice या नामासाठी **नाद** न वापरता **घोष** वापरणे बरे. इंग्लिशमधल्या **X : Xeme : allo X**

या आकृतिबंधाचे अनुकरण मराठीत **स्वन : स्वनिम : स्वनांतर** असे केले खरे पण morpheme च्या संदर्भात रूप, रूपिम, रूपांतर हे अनुकरण जमत नाही. रूप ही संज्ञा form साठी ठेवणे जरूरीचे आहे. पण नियमित घडण टिकवण्यासाठी प्रस्तुत कोशात **X इका** या रूपाचा उपयोग केला आहे; जसे **स्वनिका** : स्वनिम : **स्वनिकांतर** (यामुळे **स्वन** आणि **रूप** या संज्ञा इतर कामासाठी मोकळया होतात.)

(९) **भाषेच्या स्वाभाविक मर्यादांचे भान :** पारिभाषिक संज्ञा अशी असावी की ती नेहमीच्या वाक्यरचनेत सुखाने रुळावी. पण अर्थ नीटपणे व्यक्त होणार नसेल तर भाषेच्या स्वाभाविक मर्यादा निःशंक ओलांडाव्या.

उदाहरणार्थ, **घर्षक** संज्ञा मराठीत वापरायची तर ती पुंलिंगी की नपुंसकलिंगी हे ठरवायला पाहिजे, भाषाविज्ञानाशी या लिंगनिश्चितीचा काही संबंध नसला तरी ते ठरवायला पाहिजे. मराठीची ती स्वाभाविक मर्यादा आहे. मात्र **सुर** हे रूप संस्कृतमध्ये नाही म्हणून **सुर**, **सुरयोजन**, **वाक्यसुर** या संज्ञांना बिचकण्याचे कारण नाही. तत्त्व क्रमांक ५ चे पालन होत आहे हे अधिक महत्त्वाचे. dialectology साठी **बोलीविज्ञान** या मिश्रजात संज्ञेचे समर्थन अशाच प्रकारे करता येईल. या कोशात सुचवलेल्या काही संज्ञा मराठीच्या प्रकृतीच्या मानाने जरा लांबलचक वाटतील, पण त्या पारदर्शक आहेत हे महत्त्वाचे. इतर तत्त्वांना त्या धरून असल्या तर चिंतेचे कारण नाही.

(१०) **बदलत्या गरजांचा मुकाबला आवश्यक :** पारिभाषिक संज्ञा अशी असावी की ती विविध संदर्भात कार्यक्षम ठरेल, त्यासाठी ती बहुगुणी असावी, शब्दसाधनेला अनुकूल असावी, आणि निरुपयोगी पारदर्शकपणापासून मुक्त असावी.

उदाहरणार्थ, preposition आणि postposition यांच्यापेक्षा adposition ही इंग्लिश आणि मराठी या दोन्ही भाषांना लागू पडणारी संज्ञा बरी, **पूर्वयोगी** आणि **उत्तरयोगी** यांच्यापेक्षा **शब्दयोगी** ही संज्ञा बरी. ज्या ज्या भाषेत plural आहे तिला **बहुवचन** संज्ञा जुळते. उलट **अनेकवचन** संज्ञेवर मात्र मर्यादा आहेत. संस्कृतसारख्या तीन संख्यावचने असणाऱ्या भाषेला किंवा फिजीयनसारख्या द्विवचन आणि अल्पवचन वागवणाऱ्या भाषेला ती पारदर्शकपणे लागू पडणार नाही. इंग्लिश भाषेसाठी wh-question ही संज्ञा पारदर्शक ठरते खरी, पण त्या पारदर्शकपणाचा फ्रेंच किंवा मराठी सारख्या भाषांना काय उपयोग? बहुगुणीपणा साधण्याचा आणखी एक प्रकार म्हणजे भारतामधल्या सगळया नाही तरी बऱ्याच भाषांमधून वापरता येईल अशी संज्ञा निवडायची. म्हणून तर selection संज्ञेला प्रतिशब्द देताना **निवड** या संज्ञेबरोबर **निर्वाचन** ही संज्ञाही हाताशी ठेवायची.

(११) **सीमोल्लंघनासाठी तरतूद आवश्यक :** परिभाषेच्या क्षेत्रासंबंधी एका बाजूला त्या क्षेत्रामधली जाणकार मंडळी आणि दुसऱ्या बाजूला क्षेत्राबाहेरची अतज्ञ मंडळी म्हणा किंवा इतर क्षेत्रांमधली तज्ञ मंडळी म्हणा यांच्यामधले

उदाहरणार्थ, इंग्लिश भाषेत ज्याला ब्रिटिश लोक fricative म्हणतात त्याला अमेरिकन लोक spirant म्हणतात. ही आधीच काही बरी गोष्ट नव्हे, आणि त्याखातर मराठी भाषकांनी पहिल्याला **घर्षक** आणि दुसऱ्याला समजा **श्वासक** अशा दोन संज्ञा वागवण्याची काही गरज नाही. प्रस्तुत कोशात spirant खाली पाहिले तर **spirant** (*better :* **fricative**) एवढा हवाला फक्त मिळेल. जर **–वाचक, –सूचक, –द्योतक, –अर्थी** अशी निरनिराळी रूपे हाताशी आहेत तर त्यांचा वाटेल तसा उपयोग करणे वेंधळेपणाचे आहे, त्या त्या रूपांमध्ये अर्थाच्या दृष्टीने निश्चित पद्धतीने फरक करणे हा भाषिक संपत्तीचा डोळस उपयोग ठरेल.

(७) **शब्दरूपाकडून अर्थाची सुलभ प्राप्ति :** पारिभाषिक संज्ञा शक्य तितकी पारदर्शी असावी.

उदाहरणार्थ, number साठी **वचन** पेक्षा **संख्यावचन** ही अधिक बरी संज्ञा आहे. **एकवचन** किंवा **बहुवचन** यांमधून **वचन** वेगळे काढले असणार, त्याचा अर्थ 'संख्या दाखवणारे' नसून केवळ 'दाखवणारे' एवढाच आहे. **पद** (म्हणजे **आत्मनेपद, परस्मैपद** या दोन्हीसाठी), **अर्थ** (म्हणजे **आज्ञार्थ, विध्यर्थ** इत्यादि), आणि **लिंग** (म्हणजे **पुंलिंग, स्त्रीलिंग, नपुंसकलिंग**) या संज्ञा अशाच गाफीलपणाने तयार झालेल्या आहेत. पहिल्या उदाहरणात diathesis साठी **उपग्रह** ही संज्ञा परंपरेत उपलब्ध आहे. दुसऱ्या उदाहरणात mood साठी प्रस्तुत कोशात **अभिवृत्ति** ही संज्ञा सुचवली आहे. तिसऱ्या उदाहरणात मात्र **लिंग** (म्हणजे खरे तर खूण) ही संज्ञा टाळणे कठीण दिसते; इंग्लिशमधल्या gender ची स्थिति फारशी वेगळी नाही (gender म्हणजे केवळ जात, प्रकार). **लिंग** संज्ञेच्या अपारदर्शकपणाची भरपाई तिच्या व्यवहारातील sex-kind या परिचित अर्थामुळे झाली आहे एवढे खरे. preposition आणि prepositional phrase संज्ञा मराठी भाषेसाठी वापरणे किंवा anaphora संज्ञा पूर्ववर्ती प्रतिनिधीसाठी वापरणे योग्य नाही. Glossematics या अपारदर्शी संज्ञेपेक्षा Copenhagen School किंवा Hjelmslevian School या सामीप्यमूलक लक्षणेवर आधारलेल्या संज्ञा पुष्कळ बऱ्या. भाषेच्या उगमाबद्दलच्या उपपत्तींना दिलेली bow-wow theory किंवा ding-dong theory ही टोपणनावे किंवा प्रक्रियेचे उदाहरण देऊन काम भागवणारी **बहुव्रीहि-समास** ही संज्ञा किंवा click consonant ही नादानुकारी संज्ञा या आपल्या पारदर्शी-पणाच्याच जोरावर टिकून आहेत.

(८) **अर्थाकडून शब्दरूपाची सुलभ प्राप्ति :** पारिभाषिक संज्ञा जितकी नियमित पद्धतीने घडवलेली असेल तितके चांगले.

उदाहरणार्थ, नाम tooth तर विशेषण dental, नाम tooth-ridge तर विशेषण alveolar ही इंग्लिशमधली स्थिती गैरसोयीची आहे. (दुसऱ्या उदाहरणात tooth-ridge ऐवजी alveolus वापरून ही गैरसोय दूर करता येईल.) **सघोष** किंवा **घोषवत्** आणि **अघोष** ही विशेषणे लक्षात घेतली तर voice या नामासाठी **नाद** न वापरता **घोष** वापरणे बरे. इंग्लिशमधल्या **X : Xeme : allo X**

या आकृतिबंधाचे अनुकरण मराठीत **स्वन : स्वनिम : स्वनांतर** असे केले खरे पण morpheme च्या संदर्भात रूप, रूपिम, रूपांतर हे अनुकरण जमत नाही. रूप ही संज्ञा form साठी ठेवणे जरूरीचे आहे. पण नियमित घडण टिकवण्यासाठी प्रस्तुत कोशात **X इका** या रूपाचा उपयोग केला आहे; जसे **स्वनिका** : स्वनिम : **स्वनिकांतर** (यामुळे **स्वन** आणि **रूप** या संज्ञा इतर कामासाठी मोकळया होतात.)

(९) **भाषेच्या स्वाभाविक मर्यादांचे भान :** पारिभाषिक संज्ञा अशी असावी की ती नेहमीच्या वाक्यरचनेत सुखाने रुळावी. पण अर्थ नीटपणे व्यक्त होणार नसेल तर भाषेच्या स्वाभाविक मर्यादा निःशंक ओलांडाव्या.

उदाहरणार्थ, **घर्षक** संज्ञा मराठीत वापरायची तर ती पुंलिंगी की नपुंसकलिंगी हे ठरवायला पाहिजे, भाषाविज्ञानाशी या लिंगनिश्चितीचा काही संबंध नसला तरी ते ठरवायला पाहिजे. मराठीची ती स्वाभाविक मर्यादा आहे. मात्र **सुर** हे रूप संस्कृतमध्ये नाही म्हणून **सुर, सुरयोजन, वाक्यसुर** या संज्ञांना बिचकण्याचे कारण नाही. तत्त्व क्रमांक ५ चे पालन होत आहे हे अधिक महत्त्वाचे. dialectology साठी **बोलीविज्ञान** या मिश्रजात संज्ञेचे समर्थन अशाच प्रकारे करता येईल. या कोशात सुचवलेल्या काही संज्ञा मराठीच्या प्रकृतीच्या मानाने जरा लांबलचक वाटतील, पण त्या पारदर्शक आहेत हे महत्त्वाचे. इतर तत्त्वांना त्या धरून असल्या तर चिंतेचे कारण नाही.

(१०) **बदलत्या गरजांचा मुकाबला आवश्यक :** पारिभाषिक संज्ञा अशी असावी की ती विविध संदर्भात कार्यक्षम ठरेल, त्यासाठी ती बहुगुणी असावी, शब्दसाधनेला अनुकूल असावी, आणि निरुपयोगी पारदर्शकपणापासून मुक्त असावी.

उदाहरणार्थ, preposition आणि postposition यांच्यापेक्षा adposition ही इंग्लिश आणि मराठी या दोन्ही भाषांना लागू पडणारी संज्ञा बरी, **पूर्वयोगी** आणि **उत्तरयोगी** यांच्यापेक्षा **शब्दयोगी** ही संज्ञा बरी. ज्या ज्या भाषेत plural आहे तिला **बहुवचन** संज्ञा जुळते. उलट **अनेकवचन** संज्ञेवर मात्र मर्यादा आहेत. संस्कृतसारख्या तीन संख्यावचने असणाऱ्या भाषेला किंवा फिजीयनसारख्या द्विवचन आणि अल्पवचन वागवणाऱ्या भाषेला ती पारदर्शकपणे लागू पडणार नाही. इंग्लिश भाषेसाठी wh-question ही संज्ञा पारदर्शक ठरते खरी, पण त्या पारदर्शकपणाचा फ्रेंच किंवा मराठी सारख्या भाषांना काय उपयोग? बहुगुणीपणा साधण्याचा आणखी एक प्रकार म्हणजे भारतामधल्या सगळ्या नाही तरी बऱ्याच भाषांमधून वापरता येईल अशी संज्ञा निवडायची. म्हणून तर selection संज्ञेला प्रतिशब्द देताना **निवड** या संज्ञेबरोबर **निर्वाचन** ही संज्ञाही हाताशी ठेवायची.

(११) **सीमोल्लंघनासाठी तरतूद आवश्यक :** परिभाषेच्या क्षेत्रासंबंधी एका बाजूला त्या क्षेत्रामधली जाणकार मंडळी आणि दुसऱ्या बाजूला क्षेत्राबाहेरची अतज्ज्ञ मंडळी म्हणा किंवा इतर क्षेत्रांमधली तज्ज्ञ मंडळी म्हणा यांच्यामधले

संज्ञापन मुखाने होण्याची ज्या प्रसंगी गरज असते त्या प्रसंगी अपारदर्शक संज्ञा टाळाव्या, बहुगुणी संज्ञा वापराव्या, आणि परिचित, निदान अतिशय परिचयसुलभ संज्ञा वापराव्या.

ज्या भाषावैज्ञानिक संज्ञा शालेय व्याकरणांमधून वापराव्या लागणार त्या निवडताना विशेष काळजी घ्यावी लागते: आता **शब्दयोगी** ही संज्ञा विशेष समाधानकारक नाही हे खरे, नामयोगी संज्ञा अधिक पारदर्शी ठरली असती. पण शालेय मराठी व्याकरणांमधून **शब्दयोगी** ही संज्ञा इतकी परिचित झाली आहे की ती हलवायची म्हणजे विचार पडतो. (हिंदी शालेय व्याकरणात **संबंध-सूचक** किंवा **परसर्ग** वापरतात.) ज्या ठिकाणी भाषावैज्ञानिकाला **पद** ही अधिक काटेकोर संज्ञा वापरणे पसंत पडेल त्या ठिकाणी सुद्धा सर्वसामान्य संदर्भात त्याला **शब्द** ही संज्ञा वापरणेच भाग पडेल. ज्या ठिकाणी adverb किंवा **क्रियाविशेषण** याचा संबंध verb किंवा **क्रियापद** यांच्याकडे पोचत नाही त्या ठिकाणी या संज्ञा ठेवाव्या का ? पुन्हा तशाच प्रकारचे प्रश्न उभे राहतात.

(१२) **स्वीकार्यता :** पारिभाषिक संज्ञा अशी असावी की संबंधित भाषा बोलणारे ती सहज स्वीकारतील आणि त्यांना ती परिचयसुलभ ठरेल.

उदाहरणार्थ, मराठी-भाषकाच्या तोंडी **ह्वेल्म्स्लेव्ह-संप्रदाय** पेक्षा **कोपनहेगन-संप्रदाय** बसणे अधिक सुलभ ठरावे. संस्कृत भाषेतून उसनवारी करताना मराठी-मध्ये काही पायंडे पडले आहेत. जसे नामे आणि विशेषणे ही प्रातिपदिक स्वरूपात घतली जातात, मात्र हे प्रातिपदिक स्वामिन्, मनस्, गुणवत्, महत् यांच्याप्रमाणे व्यंजनान्त नसावे. तसे असल्यास ते टाळले जाते, अनुक्रमे स्वामी, मन, गुणवान/गुणवंत, महान/महा अशी रूपे होतात, वाच् (किंवा वाक्) याऐवजी वाचा हे नाम अधिक वापरण्यात येते. ज्या नामांच्या बाबतीत लिंग निवडायला वाव असतो (उदाहरणार्थ **स्वनिम** किंवा **घर्षक** पुंलिंगी किंवा नपुंसकलिंगी) त्या ठिकाणी अनेक गोष्टी विचारात घेतल्या आहेत. **स्वनिम** पुंलिंगी का तर जवळच्या अर्थाचा **वर्ण** शब्द पुंलिंगी, **घर्षक** नपुंसकलिंगी का तर **घर्षके** हे बहुवचन **घर्षक** या पुंलिंगी बहु-वचनापेक्षा अधिक सोयीचे, गुण किंवा वृद्धी टाळावी, का तर त्यामुळे शब्दाची ओळख पटणे मराठी भाषकांच्या दृष्टीने अवघड जाते, **वैयाकरण** पेक्षा **व्याकरणकार** ही संज्ञा बरी, **स्वानिक** पेक्षा **स्वनीय** बरी. कधी तर ओळख पटणे, शब्द चटकन तोंडी बसण या कारणांसाठी शब्द संयोगी-चिह्नाने तोडून गुण, वृद्धी, संधी या प्रक्रिया थोपवाव्या लागतात. मग **द्वैभाषिक** ऐवजी **द्वि-भाषिक, क्रियाविशेषणीय वाक्य** ऐवजी **क्रियाविशेषण-उपवाक्य** पत्करावे लागते.

(१३) **परिचितता :** पारिभाषिक संज्ञा शक्यतोवर अशी असावी की ती व्यवहार-सापेक्ष भाषाव्यवहारात किंवा दुसऱ्या एखाद्या परिचित परिभाषेत रुळलेली असावी आणि तिला मिळायचा नवा पारिभाषिक अर्थ जुन्या परिचित अर्थाशी जुळता असावा. निदान ती संश्लिष्ट असल्यास तिचे घटक परिचित असावे. हे सगळे साधताना पैतृक शब्द, शब्दघटक हे आदत्त शब्द, शब्दघटक यांच्यापेक्षा अधिक पसंत केले जातील.

उदाहरणार्थ, alveolus साठी अधिक काटेकोर संज्ञा **दंतमूल-प्रवर्ध,** अधिक जुनी संज्ञा **वर्स्व** (**वर्त्स** हे त्याचे वाचनप्रमादामुळे झालेले रूप) यांच्यापेक्षा **दंतमूल** ही संज्ञा बरी. **बहुव्रीहि-समास** ही संज्ञा मराठीत पारदर्शी ठरत नाही, कारण **बहुव्रीहि** (पुष्कळ तांदुळवाला) हे त्या प्रक्रियेचे उदाहरण मराठीत प्रचलित नाही. slang या इंग्लिश संज्ञेला चटकन प्रतिशब्द मिळत नाही म्हणून ती **स्लँग** या स्वरूपात मराठीत तशीच घेऊन चालणार नाही. एक तर भारतीय लोक इंग्लिश भाषा वापरताना खुशाल कसल्याही अप्रतिष्ठित, असांकेतिक शब्दयोजनेला slang म्हणून मोकळे होतात. भाषा हाताळण्याचे जे शैलीगत पर्याय आहेत, त्यांना म्हणजे अनुक्रमे deviation, distortion, extension, selection यांना **विवर्तन विरूपण, विस्तारण, निर्वाचन** ह्या पंडिती संस्कृत शब्दांपेक्षा **पालट, मोडतोड, खेचणी, निवड** हे देशी शब्द बरे. आता असेही म्हणता येईल की हे दोन्ही शब्द ठेवावे कारण ते तुल्यार्थ असले तरी ते वेगळ्या कामांसाठी वापरता येतील. (तत्त्व ६ त्यामुळे आड येऊ नये.) ज्या संज्ञेला पारंपरिक विद्येमध्ये एक अर्थ असेल (उदाहरणार्थ **पद** या संज्ञेला word, विकारासहित word हा अर्थ परंपरेमुळे परिचित झालेला आहे) त्या संज्ञेला त्याऐवजी किंवा त्याखेरीज दुसराच एक अर्थ आणून चिकटवणे (उदाहरणार्थ **पद** याला morph हा अर्थ देऊन त्यावरून morpheme साठी **पदिम** ही संज्ञा साधणे) निश्चितच अयोग्य ठरेल.

(१४) **अल्पाक्षरता :** पारिभाषिक संज्ञा शक्यतोवर अल्पाक्षर आणि म्हणून परिचयसुलभ असावी—विशेषत: जी संज्ञा वारंवार वापरावी लागणार असेल ती अल्पाक्षर असावी.

आता phonology शब्दाची संदिग्धता दूर करणारे **स्वनव्यवस्था** आणि **स्वन-व्यवस्थाविचार** हे दोन पारदर्शी शब्द त्या शब्दाच्या जागी वापरणे केव्हाही चांगले (तत्त्वे ५ आणि ७ पहा.). पण हा विचार **स्वनव्यवस्थाविचार** याचा **स्वनविचार** असा **संक्षेप** करणे यांच्या आड येत नाही. (विशेषत: sentence phonology साठी पर्याय ठेवताना **वाक्यगत स्वनविचार** यासारख्या दीर्घ संज्ञेच्या बाबतीत असा संक्षेप करणे बरे पडते.) पाणिनीने घडवलेल्या काही संज्ञा मात्र सामान्य वापराला फारच अल्पाक्षर आहेत——अगदी वैयाकरण मंडळी सुद्धा **काल-अभिवृत्ति** या व्याकरणिक कोटीला **ल्** न म्हणता **लकार** तरी म्हणतात.

(१५) **अल्पसंश्लिष्टता :** पारिभाषिक संज्ञा शक्यतोवर अशी असावी की तिचे घटक कमी आणि रचना सोपी असावी, म्हणजे ती परिचयसुलभ राहील—विशेषत: जी संज्ञा वारंवार वापरावी लागणार असेल ती अल्पसंश्लिष्ट असावी.

**दंतमूल-प्रवर्ध** अधिक काटेकोर संज्ञा म्हणून वापरायला बरी हे खरे, पण **ऊर्ध्व-अग्र-दंत-मूल-प्रवर्ध** ही त्याहूनही काटेकोर म्हणायला पाहिजे. पण म्हणून काही ती वापरावी असे कुणी म्हणणार नाही. **गुजराती-भाषक** किंवा **गुजराती-भाषी** या सुटसुटीत संज्ञा सोडून **गुजराती-भाषा-भाषी** ही बोजड आणि पुनरुक्तियुक्त

संज्ञा कशाला वापरावी ? कारण नसताना **सं–, सु–, प्र–, अभि–,** (फार काय **सत्-** देखील) असे उपसर्ग आणि **क** सारखा **स्वार्थ** प्रत्यय यांचा उपयोग बरा नव्हे––fricative साठी **संघर्षी** कशाला आणि minority साठी विशेषण म्हणून **अल्पसंख्याक** कशासाठी ? (प्र. के. अत्रे आणि मा. त्रि. पटवर्धन यांनी आपल्या उपहासात्मक विडंबनाने मराठीत एकेकाळी पसरलेल्या या माथीला चांगलाच आळा घातला.)

(१६) **पारिभाषिक आदानप्रदानावर मर्यादा :** एका कार्यक्षेत्रामधून दुसऱ्या कार्यक्षेत्रात एखादी पारिभाषिक संज्ञा प्रदान होते तेव्हा त्या दोन्ही कार्यक्षेत्रांच्या गरजा आणि साध्ये यांच्या मर्यादा अशा प्रदत्त संज्ञेच्या प्रयोगावर पडतात.

तसेच काही कारण असल्याशिवाय एखाद्या कार्यक्षेत्रामधून घेतलेल्या संज्ञेमध्ये साळढाळपणे फेरफार करू नयेत. स्वनविज्ञानात शारीरामधून palate आणि dorsum (of the tongue) या संज्ञा घेतलेल्या आहेत. आता शारीरामध्ये एकच palate आहे (तथाकथित hard palate), जोडीला आहे velum palati (तथाकथित soft palate). हे लक्षात घेऊन प्रस्तुत कोशात **कठिन तालु** आणि **कोमल तालु** या संज्ञा त्याज्य ठरवल्या आहेत, त्यांच्याबद्दल अनुक्रमे **तालु** आणि **तालुच्छद** ग्राह्य ठरवल्या आहेत. (**तालु**चा पारंपरिक अर्थ हाच आहे.) काही स्वनवैज्ञानिक dorsum चा उपयोग back of the tongue साठी करतात तेही त्याज्य आहे. शारीरामध्ये dorsum म्हणजे जिभेचा सर्वच वरचा पृष्ठभाग किंवा **जिह्वापृष्ठ (पश्चजिह्वा** नव्हे). असे जरी असले तरी त्याचा अर्थ असा नाही की स्वनविज्ञानात processus alveolaris maxillae किंवा rima glottidis या शारीरातल्या प्रमाणभूत संज्ञा alveolis आणि glottis असा संक्षेप न करता जशाच्या तशा वापराव्या. तो तर पढतमूर्खपणा ठरेल. ॲरिस्टॉटलच्या तर्कशास्त्रातून subject आणि predicate या संज्ञा किंवा फ्रेगेच्या तर्कशास्त्रातून गणितावर घेतलेल्या argument आणि predicate/function या संज्ञा उचलून घेताना व्याकरणकार-मंडळीची जरा त्रेधाच उडते : भाषाव्यवस्थेबद्दल त्यांच्या ज्या ज्या उपपत्ती असतील त्यांच्या मर्यादा या संज्ञांच्यावर पडणारच– त्यामुळे त्यांच्या तर्कशास्त्रीय आणि भाषावैज्ञानिक उपयोगात काहीशी तफावत पडणारच: तर्कशास्त्रज्ञांनी त्याबद्दल कुरकुरू नये की भाषावैज्ञानिकांनी त्याची खंत वाळगू नये.

(१७) **पारिभाषिक भाषांतरासाठीचे पर्याय :** जेव्हा एका भाषेतील पारिभाषिक संज्ञांचे दुसऱ्या भाषेत संक्रमण होते तेव्हा ते प्रत्यक्ष आदान किंवा अनुवादरूप आदान या दोन प्रकारांनी होते. तसे ते करताना त्या संज्ञेची पारदर्शिता गमावू नये. पारिभाषिक व्याप्तिलक्षी संज्ञा प्रत्यक्ष आदान पद्धतीने घेणे चांगले, तर पारिभाषिक गुणलक्षी संज्ञा अनुवादरूप आदान पद्धतीने घेणे चांगले. अनुवादरूप आदान करताना इतिहासजन्य साम्य, फार काय योगायोगाचे साम्य यांचा उपयोग करून घ्यावा, नवीन शब्द घडवण्यापूर्वी जुन्या शब्दरूपांचे पुनरुज्जीवन करून भागल्यास पहावे. आदान करताना प्रदायक भाषेतले परिभाषेचे दोष कायम ठेवण्याची गरज नाही आणि आदायक भाषेत नवीन दोष शिरू न देण्याची काळजी घेण्याची गरज आहे.

मूलद्रव्ये, संयुगे, परिमाणे, विशेषनामे, प्राणिनामे, वनस्पतिनामे, खनिजनामे, इत्यादींसाठी इंग्लिश संज्ञा ठेवाव्या पण संकल्पनांसाठी अवश्य भारतीय भाषेतील संज्ञा वापराव्या हा भारत सरकारच्या वैज्ञानिक तकनीकी-शब्दावली-स्थायी आयोगाचा निर्णय व्याप्तिलक्षी संज्ञा आणि गुणलक्षी संज्ञा यांमध्ये करायच्या भेदावर आधारलेला असून योग्यच आहे.

मराठीसारख्या अर्वाचीन भारतीय-आर्य भाषेचा उपयोग करताना प्राचीन भारतीय व्याकरणादि परंपरांचा पैतृक संपत्ती म्हणून उपयोग करून घेणे स्वाभाविक असल्याने जुन्या संस्कृत संज्ञांचे पुनरुज्जीवन आणि अनुवादरूप आदानाचा आश्रय घेणे हे पर्याय सबळ ठरतात. व्युत्पत्तिजन्य साम्ये (उदाहरणार्थ ग्रीक sym-, लॅटिन com-, संस्कृत **सं-**, किंवा जर्मन ab-, laut, संस्कृत अप-, श्रुति) आणि योगायोगाची साम्ये (उदाहरणार्थ survey आणि **सर्वेक्षण**) यांची मदत तर होणारच. इंग्लिश भाषेने soft आणि hard या जुन्या मोघम संज्ञा टाकून देऊन संस्कृत भाषेतल्या **घोषवत्** आणि **अघोष** संज्ञा voiced आणि voiceless या रूपाने कायम केल्या याचा विसर पडून मराठीत **मृदु** आणि **कठोर** वापरत बसणे हा तर करंटेपणाच झाला. अर्थात हे सगळे करताना काळजी घ्यायला पाहिजे. नाही तर diachronic मधल्या dia- ची di- या प्रत्ययाशी गफलत करून त्यासाठी **द्वैकालिक** हा चुकीचा प्रतिशब्द तयार करून आपण मोकळे होणार. High German ऐवजी **उच्च जर्मन** म्हणणे दिशाभूल करणारे आहे; high चा संबंध सामाजिक प्रतिष्ठेशी नसून दक्षिण जर्मनीच्या समुद्रसपाटीपासूनच्या उंचीकडे पोचतो. semantics ला वर्णसाम्य राखणारा प्रतिशब्द म्हणून **सीमांतिकी** ही संज्ञा सुचवणे म्हणजे जरा अतीच झाले.

इंग्लिशमध्ये vocal cord ही सदोष संज्ञा, कंठद्वारीय कंपनांच्या एका टाकून दिलेल्या चुकीच्या उपपत्तीवर आधारलेली आणि vocal fold ही संज्ञा निदान बाह्यांगवर्णन तरी योग्य करते तेही न करणारी. ह्याचप्रमाणे hard आणि soft ही जोडी सदोषपणे अनेक अर्थभेदांसाठी वेठीला धरलेली : **अघोष/ सघोष, परुष/ कोमल** (fortis/lenis), **अतालव्यरंजित/तालव्यरंजित, अतालव्यरंजक/तालव्यरंजक** हे सर्व अर्थ तिच्यावर लादलेले, जोडीला hard palate/soft palate आहेच (योग्य संज्ञा palate/velum). आणखी एक सदोष संज्ञा आहे central vowel; central किंवा **केंद्रिय** म्हणजे एखाद्या क्षेत्राचा किंवा अवकाशाचा मध्य; या ठिकाणी म्हणायचे आहे एका अक्षाचा मध्य. आता या सदोष संज्ञा मराठीत जशाच्या तशा अनुवादित करणे याला गुलामी मनोवृत्ती म्हणायचे की अडाणीपणा?

(१८) **मतभिन्नतेच्या परिभाषांतरणावर पडणाऱ्या मर्यादा :** जेव्हा संबंधित क्षेत्रामधल्या एका संप्रदायाच्या पारिभाषिक संज्ञांचा समभाषिक किंवा अन्यभाषिक अनुवाद दुसऱ्या संप्रदायाच्या पारिभाषिक संज्ञांमध्ये करण्याचा प्रयत्न होतो तेव्हा समानार्थकता पूर्णपणे साधत नाही, काही घसारा किंवा मोडतोड होणारच. समानार्थकता म्हणजे फार तर समान वस्तुनिर्देश साधतो.

उदाहरणार्थ, ॲरिस्टॉटलचा subject/predicate भेद म्हणजे काय तर एकच argument आणि त्याचे predicate ही जोडी असे फ्रेगे-सांप्रदायिकांनी म्हणणे ॲरिस्टॉटल-संप्रदायावर अन्याय करणारे आहे. हॅरिस या भाषावैज्ञानिकाचे transformation म्हणजे लॅंबच्या परिभाषेतले mutation (जे लॅंब त्याज्य ठरवतो) आणि चॉम्स्कीचे transformation म्हणजे लॅंबच्या परिभाषेतले manifestation ही समीकरणे ढोबळ मानानेच खरी आहेत. या कोशात सामान्य धोरण पत्करले आहे ते असे— phoneme सारखी वादग्रस्त संज्ञा (स्वनिकांचे कुल? घटक-गुणांचा पुंज? परायत्त चलपदांमधले स्थिरपद? बोधनीय चिह्नकांचे अमूर्त चिह्नित) किंवा transformation सारखी वादग्रस्त संज्ञा यांना एकेकच मराठी प्रतिशब्द ठेवायचा. एक संपूर्ण व्याख्यादायी कोश तयार केला तर त्यात **स्वनिम** किंवा **रचनांतरण** या संज्ञांना मतमतांतरानुसार अनेक पर्यायी व्याख्या नोंदवाव्या लागतील.

(१९) **स्थलकालसापेक्षतेच्या परिभाषांतरणावर पडणाऱ्या मर्यादा**: जेव्हा भाषांचे संज्ञापनजाल किंवा ऐतिहासिक कालखंड यांच्या सीमा ओलांडून समभाषिक किंवा अन्यभाषिक अनुवाद करण्याचा प्रयत्न होतो तेव्हा समानार्थकता पूर्णपणे साधत नाही, काही घसारा किंवा मोडतोड होणारच. समानार्थकता म्हणजे फार तर समान वस्तुनिर्देश साधतो.

प्राचीन भारतीय संज्ञांचा अर्वाचीन भारतीय संज्ञांशी मेळ घालताना इतिहासजन्य फट सांधायला आपण पाहतो. उलट त्यांचा अर्वाचीन पाश्चात्य संज्ञांशी मेळ घालताना पडणारी फट ही जशी कालखंडामधली फट आहे तशी भाषिक संज्ञापनजाले वेगळी असल्यामुळे पडणारी भौगोलिक फटही आहे. suggestion आणि व्यंजनाव्यापार यांचे समीकरण नीट बसत नाही. याहून थोडा सोपा प्रश्न उदाहरणादाखल घ्यायचा तर **शिक्षा** या संज्ञेच्या व्याप्तीमध्ये phonetics, phonology, orthoepy सर्वच येतात. **प्रकृति** म्हणजे केवळ base म्हणणे कठीण, केवळ stem म्हणणे कठीण. **वर्ण** म्हणजे जसा phoneme होतो तसा त्याला एकासएक जबाब देणारा लिखित आकारही ठरतो. म्हणजे गंमत अशी की लॅटिनमधली litera ही संज्ञा ही **वर्ण** च्या जेवढी जवळ जाते तेवढी phoneme ही संज्ञा जाऊ शकत नाही.

ही जी तत्त्वे आतापर्यंत एकामागून एक नमूद केली ती एका विशिष्ट उतरत्या क्रमाने नमूद केली आहेत. यातल्या दोन तत्त्वात विरोध आला तर आधीचे तत्त्व बलवत्तर समजावे. परिभाषा घडवण्यासाठी काही थोडी सुटसुटीत तत्त्वे सांगू पाहणारांच्या एक गोष्ट लक्षात येत नाही की ही तत्त्वे प्रश्नाला बगल देणारी असतात. समजा आपण म्हटले की संज्ञा सोपी असावी. पण सोपी म्हणजे काय? संज्ञा म्हणजे काय? या प्रश्नांची निश्चित उत्तरे यामागे नसतात. ज्यांच्या लक्षात प्रश्नांचा गुंता येतो ती मंडळी पुष्कळदा फारच लवकर हातपाय गाळतात. त्यांच्या हे लक्षात यायला पाहिजे की परिभाषेसंबंधीचे प्रश्न नीटपणे सुटणे हे साध्य आहे (मात्र चिकाटी आणि सावधपणा पाहिजे) आणि आवश्यकही आहे (नाहीपेक्षा

मंडळींना एकमेकांचे धडपणे समजणार नाही, फार काय स्वतःचे स्वतःलाही धडपणे समजणार नाही). म्हणून तर हा एवढा विस्तार करून परिभाषा निश्चितीची अंतर्निहित तत्त्वे सांगितली. ती भाषाविज्ञानाखेरीज इतर क्षेत्रांमधल्या मंडळींच्याही कामी यावी.

## (तीन) कोशाच्या उपयोगकर्त्यासाठी मार्गदर्शिका

कोशाच्या प्रत्येक नोंदीमध्ये जास्तीत जास्त आठ घटक असतात. ते पुढे दिले आहेत :

(१) नोंदीचे शीर्षक (इंग्लिश भाषेत)
(२) व्याकरणिक निर्देशक
(३) अर्थासंबंधीचे निर्देशक (उपयोगी असेल तेव्हा उपस्थित)
(४) खुलासा (उपयोगी असेल तेव्हा उपस्थित)
(५) प्रतिनिर्देश (जरूर तेव्हा उपस्थित)
(६) मराठी प्रतिशब्द
(७) टीप (जरूर तेव्हा उपस्थित)
(८) शोध-यादी (उपयोगी असेल तेव्हा उपस्थित)

जर प्रतिनिर्देश हा better म्हणजे अधिक ग्राह्य अशा इंग्लिश संज्ञेकरिता असेल तर मराठी प्रतिशब्द वेगळा दिलेला नाही.

(१) **नोंदीचे शीर्षक** (इंग्लिश भाषेत, जाड ठशात, जरूर तिथेच आद्याक्षर कॅपिटल, आणि नंतर स्वल्पविराम) : यात सुटा शब्द किंवा पुनःपुनः येणारा शब्दघटक (ज्याला संयोगी चिह्न जोडलेले असेल) किंवा शब्दसमूह (शब्द प्रघातानुसार जोडलेले, तोडलेले, किंवा संयोगीचिह्नांकित) असू शकेल, जसे :

**noun,**

**proto-,**

**field work,**

**Middle,**

**off-glide,**

**open vowel,**

नोंदीच्या शीर्षकाचा एखादा भाग कमी औपचारिक शैलीत गाळण्यासारखा असेल तर तो (          ) मध्ये टाकला आहे. जसे :

**future (tense),**

**instrumental (case (marker) ),**

म्हणजे आपण future tense किंवा future म्हणू शकतो, instrumental case marker किंवा instrumental case किंवा instrumental म्हणू शकतो.

(२) **व्याकरणिक निर्देशक** (पातळ ठशात, कॅपिटल नको, इटॅलिक वळण): हे पुढीलपैकी एक असू शकेल :

| | |
|---|---|
| *n.* | noun |
| *n. pl.* | noun plural |
| *adj.* | adjective |
| *v. i.* | verb intransitive |
| *v. t.* | verb transitive |
| *adv.* | adverb |
| *comb. form* | combining form |

जेव्हा नोंदीच्या एकाच शीर्षकाला अनेक व्याकरणिक निर्देशके लागू असतील तेव्हा पोट-नोंदींचा क्रम वर दिल्याप्रमाणे राहील—जसे, नाम म्हणून होणारा उपयोग प्रथम आणि विशेषण म्हणून होणारा उपयोग नंतर असा क्रम राहील. *n.* या निर्देशकात noun बरोबर noun phrase समाविष्ट आहे, त्याचप्रमाणे इतर निर्देशकांचेही समजावे. म्हणजे **open vowel,** *n.* याचा अर्थ, **open vowel,** *noun phrase* समजावा. जेव्हा नोंदीच्या शीर्षकाचा काही भाग गाळला तरी चालेल म्हणून ( ) मध्ये टाकलेला असेल तेव्हा व्याकरणिक निर्देशक प्रत्येक पर्यायाला लागू पडतो असे समजावे. जसे :

**instrumental (case (marker) ),** *n.*

याचा अर्थ

**instrumental case marker,** *noun phrase*

**instrumental case,** *noun phrase*

**instrumental,** *noun*

असा समजावा. instrumental हा शब्द एरवी विशेषण आहे किंवा case हा शब्द एरवी नाम आहे याकडे इथे दुर्लक्ष केलेले आहे.

नोंदीच्या ज्या शीर्षकाचा उपयोग केवळ शब्दाचा घटक म्हणून व्हायचा आहे त्याला combining form निर्देशक दिले आहे. जर त्या शीर्षकाला इतरही उपयोग असले (उदाहरणार्थ adverb, noun) तर *comb. form* असे वेगळे निर्देशक देण्याची गरज मानलेली नाही. उपसर्ग, उत्तर-प्रत्यय इत्यादींचा समावेश *comb. form* मध्येच केला आहे.

